**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त महाड जि.रायगड येथील ऐतिहासिक चवदार तळे येथील व छत्रपती शाहू महाराज मंदिरासाठी बांधकामास मंजूरी देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सान्यावि-२०२४/प्र.क्र.४४/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

महाड जि.रागयड येथील ऐतिहासिक असे डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी पाण्याचा सत्याग्रह केलेले चवदार तळे या ठिकाणी दरवर्षी २० मार्च या दिवशी खूप मोठ्या प्रमाणात लोकप्रतिनिधी,जनसमुदाय जमा होत असतात. त्यामुळे चवदार तळ्याचे सुशोभिकरण होणे अत्यंत महत्वाचे आहे. या कामाकरीता रू.७.०० कोटी व छत्रपती शाहू महाराजांच्या मंदिरासाठी रू.३.०० कोटी असा एकूण रू.१०.०० कोटी निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाड जि.रागयड येथील ऐतिहासिक असे डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी पाण्याचा सत्याग्रह केलेले चवदार तळे या ठिकाणी दरवर्षी २० मार्च या दिवशी खूप मोठ्या प्रमाणात लोकप्रतिनिधी,जनसमुदाय जमा होत असतात. तसेच लोकप्रतिनिधी देखील उपस्थित असतात त्यामुळे चवदार तळ्याचे सुशोभिकरण होणे अत्यंत महत्वाचे आहे. या कामाकरीता रू.७.०० कोटी व छत्रपती शाहू महाराजांच्या मंदिरासाठी रू.३.०० कोटी असा एकूण रू.१०.०० कोटी इतका निधी उपरोक्त कामाकरीता विशेष बाब म्हणून खालील अटींच्या अधीन राहून तत्वत: मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर कामाची कार्यान्वयीन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग राहील.
२. सदर कामाचे सविस्तर अंदाजपत्रक शासनास सादर करून त्यास प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.
३. काम सुरू करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरू करावे.
४. ढोबळ स्वरुपाम धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करून काम हाती घ्यावे.
५. सार्वजनिक बांधकाम विभागाचया शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२ दि.७.७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
६. काम सुरू करण्यापुर्वी प्रस्तावित कामाच्या अंदाजपत्रकावर मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग .मुंबई यांचे साक्षांकन घेणे आवश्यक राहील,
७. तसेच विभागाच्या प्रादेशिक उपायुक्त ,समाजकल्याण विभाग ,मुंबई यांनी साक्षांकन करावे.
८. नियोजित जागा उपभोक्ता संबंधित यंत्रणेच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करून सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

**२.** डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त महाड जि.रायगड येथील ऐतिहासिक चवदार तळे येथील व छत्रपती शाहू महाराज मंदिरासाठी बांधकामास सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त करून, विहित नियमानुसार अटी व शर्ती निश्चित करून ई-निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड यांनी तात्काळ करावी.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र.एन-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आणि इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ७८९- अनुसूचित जाती घटक योजना, ०२ भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे, (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशिर्ष २२२५ डी८२३ या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकरणी आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०३१३१९०११६७४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2024.03.13 19:11:24 +05'30'

**( अनिल कों. आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
२. उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
४. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,रायगड
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, महाड जि.रायगड
६. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
७. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई.
८. सहायक आयुक्त, समाजकल्याण, रायगड
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/रायगड/
१०.निवडनस्ती (बांधकामे)